**गुन्हे अन्वेषण विभाग, पुणे, राज्य गुप्तवार्ता विभाग, मुंबई, व महाराष्ट्र गुप्तवार्ता प्रबोधिनी, पुणे येथे तंत्रज्ञान सहायित गुन्हे अन्वेषण केंद्र स्थापन करण्यास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत.**

# महाराष्ट्र शासन

## गृह विभाग

**शासन निर्णय, क्रमांक:- संकीर्ण-२०१६/प्र.क्र.१३२/विशा-३ अ,**

मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक, २ रा मजला,
मंत्रालय, मुंबई, ४०० ०३२.
दिनांक :-०१ फेब्रुवारी, २०१७

वाचा :-

१) गृह विभाग, शासन निर्णय क्रमांक:एमआयएस २०१५/प्र.क्र.६५/विशा-३अ, दिनांक ८ फेब्रुवारी, २०१६

२) गृह विभाग, शासन निर्णय क्रमांक: संकीर्ण २०१६/प्र.क्र.५५/विशा-३अ, दिनांक १५ ऑक्टोबर, २०१६

३) शासन निर्णय क्रमांक भांखसं २०१४/प्र.क्र.८२/भाग-III/उद्योग-४, दिनांक ३० ऑक्टोबर, २०१५

४) उच्चस्तरीय शक्ती प्रदत्त समितीच्या, दिनांक २८ नोव्हेंबर, २०१६ रोजीच्या बैठकीचे कार्यवृत्त.

प्रस्तावना :-

सायबर गुन्हयांचे वाढते प्रमाण व त्याचे जनमानसावर होणारे दुष्परिणाम लक्षात घेता त्यावर प्रभावी नियंत्रण करण्याकरिता राज्यातील सर्व जिल्हा पोलीस मुख्यालये व आयुक्तालये या ठिकाणी तंत्रज्ञान सहायित गुन्हे अन्वेषण केंद्र स्थापन करण्यात आली आहेत. उच्चस्तरीय शक्ती प्रदत्त समितीच्या दिनांक २८ नोव्हेंबर, २०१६ रोजी झालेल्या बैठकीमध्ये यासंदर्भात झालेल्या निर्णयाच्या अनुषंगाने गुन्हे अन्वेषण विभाग, पुणे, राज्य गुप्तवार्ता विभाग, मुंबई व महाराष्ट्र गुप्तवार्ता प्रबोधिनी, पुणे या ठिकाणी तंत्रज्ञान सहायित गुन्हेअन्वेषण केंद्र स्थापन करण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

गुन्हे अन्वेषण विभाग, पुणे, राज्य गुप्तवार्ता विभाग, मुंबई व महाराष्ट्र गुप्तवार्ता प्रबोधिनी, पुणे येथे तंत्रज्ञान सहायित गुन्हे अन्वेषण केंद्र स्थापन करण्यास संदर्भ क्रमांक १ येथील शासन निर्णयातील (i) ते (vii) या अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

या साठी होणारा खर्च विशेष पोलीस महानिरीक्षक, सायबर व महिला अत्याचार प्रतिबंध, मुंबई यांच्या कार्यालयातील आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात आलेल्या कार्यालयीन अधीक्षक यांचेमार्फत मागणी क्र.बी-१, २०५५, पोलीस (००)(१०१), गुन्हा अन्वेषण व दक्षता, (००)(०६) सायबर व महिला विरोधी अत्याचार प्रतिबंध कक्ष (२०५५ ए ०२३) या लेखाशिर्षाखाली खर्ची टाकण्यात यावा.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०२०२१६०५४३४२२९ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Suresh M. Khade

Digitally signed by Suresh M. Khade
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Home Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=4b9c3bfe0cf5832f9fb73e937c85fff475ad0238a20da77ce26bb6669f386614, cn=Suresh M. Khade
Date: 2017.02.02 16:10:47 +05'30'

**(सुरेश खाडे)**
उपसचिव, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. पोलीस महासंचालक, महाराष्ट्र राज्य, मुंबई
२. महासंचालक तथा व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र राज्य पोलीस गृहनिर्माण व कल्याण महामंडळ, मुंबई.
३. विशेष पोलीस महानिरीक्षक, सायबर व महिला अत्याचार प्रतिबंध, मुंबई
४. अतिरिक्त पोलीस महासंचलाक,गुन्हे अन्वेषण विभाग, पुणे.
५. आयुक्त, राज्य गुप्तवार्ता विभाग, मुंबई,
६. विशेष पोलीस महानिरीक्षक व संचालक, महाराष्ट्र गुप्तवार्ता प्रबोधिनी, पुणे
७. पोलीस आयुक्त, मुंबई
८. अपर पोलीस महासंचालक, (नि.व सं.), महाराष्ट्र राज्य, मुंबई.
९. सर्व पोलीस आयुक्त
१०.सर्व पोलीस अधीक्षक
११.महालेखापाल-१ (लेखा व अनुज्ञेयता/लेखापरीक्षा), महाराष्ट्र, मुंबई
१२.अधिदान व लेखा कार्यालय, मुंबई
१३.जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
१४.उद्योग, उर्जा व कामगार विभाग (उद्योग-४), मंत्रालय, मुंबई.
१५.निवडनस्ती/गृह विभाग (विशा-३अ)